**प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेंतर्गत "स्वनिधी से समृद्धी"(टप्पा-६) कार्यक्रम राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीएमस्वनिधी-२०२०/प्र.क्र.७७/नवि-२०**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, ४ था मजला, मुख्य इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० मार्च, २०२५

**संदर्भ :-**

१) नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र. पीएमस्वनिधी-२०२०/प्र.क्र.७७/ नवि-२०, दिनांक १७.०६.२०२०, दि.१५.०२.२०२१, दि.११.०४.२०२२ दि.२७.१२.२०२२, दि.१५.०६.२०२३ व ०८.०९.२०२३

२) आवास आणि शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. D.O.No. K- १२०१२/०२/२०२०- PM-SVANidhi, दिनांक ०९.१२.२०२०.

३) आवास आणि शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.D.O.No. K १२०१२/०८/२०२०-PM-SVANidhi, दिनांक २९.१२.२०२०.

४) आवास आणि शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.D.O.No. K १२०१२/०४/२०२०-PM SVANidhi, दिनांक १६.०३.२०२२.

५) आवास आणि शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.D.O.No. K १२०१२/४/२०२०-PM SVANidhi, दिनांक १०.११.२०२२.

६) आवास आणि शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. D.O.No. K १२०१२/४/२०२०-PM SVANidhi,दिनांक २९.०५.२०२३.

७) आवास आणि शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. D.O.No. K १२०१२/४/२०२०-PM SVANidhi,दिनांक १७.०८.२०२३.

८) आवास आणि शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. D.O.No. K १२०१२/४/२०२०-PM SVANidhi,दिनांक २७.०८.२०२४.

**प्रस्तावना :-**

कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर झालेल्या टाळेबंदीचा (lockdown) मोठा परिणाम राज्यातील शहरांमधील फेरीवाले व पथविक्रेते यांच्यावर झाला असून, त्यांना पुन्हा व्यवसाय सुरु करण्यास्तव खेळते भांडवल मिळवून देण्याबाबत केंद्र सरकारने दिनांक ०१ जून, २०२० रोजी प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी या योजनेची घोषणा केली. त्यासंदर्भात तपशीलवार मार्गदर्शन सूचना उपरोक्त संदर्भीय शासन निर्णयाद्वारे निर्गमित करण्यात आल्या आहेत.

या योजनेकडे फक्त पथविक्रेत्यांना कर्ज देण्याची योजना असे न बघता त्यांच्या आर्थिक-सामाजिक अशा सर्व समावेशक प्रगतीवर भर देण्याच्या सूचना मा.प्रधानमंत्री यांनी दिल्या आहेत. या दृष्टिकोनातून पथविक्रेता योजनेच्या लाभार्थ्यांच्या कुटुंबियांचे सर्वेक्षण करून त्यांची पात्रता तपासून त्यांना शासनाच्या इतर योजनांचा फायदा मिळवून देण्याचे केंद्र सरकारने "स्वनिधी से समृद्धी" या योजने अंतर्गत योजले आहे. "स्वनिधी से समृद्धी" ही योजना प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी

योजनेचा घटक आहे. त्यानुषंगाने सदर योजना राबविण्यासाठी खालील मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेतंर्गत "स्वनिधी से समृध्दी" कार्यक्रम राज्यात राबविण्यासाठी सहाव्या टप्प्यात ०३ नगरपंचायती क्षेत्रातील प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेचे सर्व लाभार्थी व त्यांचे कुटुंबियांचे समावेशन करण्याबाबत निर्णय घेण्यात येत असून त्यानुषंगाने खालील प्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**योजनेचे उद्दिष्ट :-**

PM-SVANidhi च्या सर्व लाभार्थ्यांचे सामाजिक-आर्थिक सर्वेक्षण करून, केंद्र शासनाच्या ८ योजनांसाठी त्यांची व त्यांच्या कुटुंबीयांची पात्रता तपासणे. तसेच जिथे राज्य शासनास योग्य वाटेल तिथे राज्याच्या विविध सामाजिक-आर्थिक कल्याण योजनांचे समावेशन करता येईल.

केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार खालील ८ योजना पथविक्रेत्यांस अभिसरण Convergence करण्यासाठी निश्चित केलेल्या आहेत. त्यानुसार क्षेत्रिय स्तरावर आवश्यक ती कार्यवाही करावी

| **विभाग** | **योजना** |
|---|---|
| वित्त विभाग / राज्यस्तरीय बँकर समिती | १) प्रधान मंत्री जीवन ज्योती योजना<br>२) प्रधानमंत्री सुरक्षा विमा योजना<br>३) प्रधानमंत्री जन-धन योजना व रूपे कार्ड |
| कामगार विभाग | ४) इमारत व इतर बांधकाम अंतर्गत नोंदणीकरण<br>५) प्रधानमंत्री श्रम योगी मानधन योजना |
| अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | ६) एक राष्ट्र एक राशन कार्ड |
| सार्वजनिक आरोग्य विभाग | ७) जननी सुरक्षा योजना ८) प्रधानमंत्री मातृ वंदना योजना |

**प्रथम टप्प्यात समाविष्ट महानगरपालिका :-**

पहिल्या टप्प्यामध्ये राज्यातील १.नागपूर महानगरपालिका, २.नाशिक महानगरपालिका, ३. कोल्हापूर महानगरपालिका, ४.सांगली-मिरज-कुपवाड महानगरपालिका या चार शहरामधील महानगरपालिका क्षेत्रातील सर्व प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेचे लाभार्थी व त्यांचे कुटुंबियांचे समावेशन करण्याबाबत शासन निर्णय दि.१५.०२.२०२१ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

**द्वितीय टप्प्यात समाविष्ट महानगरपालिका**

द्वित्तीय टप्प्यामध्ये राज्यातील १५ शहरामधील महानगरपालिका क्षेत्रातील सर्व प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेचे लाभार्थी व त्यांचे कुटुंबियांचे समावेशन करण्याबाबत शासन निर्णय दि.११.०४.२०२२ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

**तृतीय टप्प्यात समाविष्ट नगरपालिका/महानगरपालिका :-**

तृतीय टप्प्यामध्ये राज्यातील १०२ शहरामधील नगरपालिका/महानगरपालिका क्षेत्रातील सर्व प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेचे लाभार्थी व त्यांचे कुटुंबियांचे समावेशन करणेबाबत शासन निर्णय दि.२७.१२.२०२२ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

**चौथ्या टप्यात समाविष्ट नगरपालिका/महानगरपालिका :-**

चौथ्या टप्प्यामध्ये राज्यातील ३१ शहरामधील नगरपालिका/नगरपंचायत क्षेत्रातील सर्व प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेचे लाभार्थी व त्यांचे कुटुंबियांचे समावेशन करणेबाबत शासन निर्णय दि.१५.०६.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

**पाचव्या टप्यात समाविष्ट नगरपालिका/महानगरपालिका :-**

पाचव्या टप्प्यामध्ये राज्यातील १४९ शहरामधील नगरपालिका/नगरपंचायत क्षेत्रातील सर्व प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेचे लाभार्थी व त्यांचे कुटुंबियांचे समावेशन करणेबाबत शासन निर्णय दि.०८.०९.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

**विस्तारीत पाचव्या टप्यात समाविष्ट नगरपरिषद/नगरपंचायती :-**

विस्तारीत पाचव्या टप्प्यामध्ये राज्यातील १५ शहरामधील नगरपालिका/नगरपंचायत क्षेत्रातील सर्व प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेचे लाभार्थी व त्यांचे कुटुंबियांचे समावेशन करणेबाबत शासन निर्णय दि.०६.१०.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

**सहाव्या टप्यात समाविष्ट नगरपरिषद/नगरपंचायती**

सह सचिव तथा मिशन संचालक (दी.अ.यो.-रा.श.आ.मि.), आवासन आणि शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांच्या दिनांक २७.०८.२०२४ रोजीच्या पत्रानुसार खालील ०३ नगरपंचायती क्षेत्रातील सर्व प्रधानमंत्री पथविक्रेता आत्मनिर्भर निधी योजनेचे लाभार्थी व त्यांचे कुटुंबियांचे समावेशन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्था |
|---|---|
| १. | नाशिराबाद नगरपंचायत |
| २. | आटपाडी नगरपंचायत |
| ३. | दिंडोरी नगरपंचायत |

संबंधित अधिकारी / कर्मचारी यांनी पथविक्रेत्यांचे स्थानिक स्तरावर कॅम्प लावून सर्वेक्षण करावे. शहरातील पथविक्रेत्यांचे सर्वेक्षण व माहिती संकलनाची जबाबदारी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. या सर्वेक्षणातून संकलित केलेली माहिती इतर योजनांच्या अंमलबजावणीसाठी संबंधित विभागांना देखील पुरविण्यात येईल.

**उदिष्टे:-**

❖ **सर्वेक्षण व माहिती संकलन :-**

पथविक्रेत्यांचे व्यक्तिशः सर्वेक्षण करून केंद्र शासनाने तयार केलेल्या संकेतस्थळावर सदर सर्वेक्षणाची माहिती भरणे अपेक्षित आहे. या संकेतस्थळावर विविध योजना अंतर्गत पात्रता तपासण्यात आल्यानंतर माहिती भरण्यात यावी. हे सर्वेक्षण व माहिती संकलन स्थानिक स्वराज्य संस्थांनी करणे अपेक्षित आहे. केंद्र शासनाने तयार केलेल्या संकेतस्थळावर PM-SVANidhi च्या लाभार्थ्यांची प्रत्येक शहरासंबंधीची माहिती पाठविण्यात आली आहे. सर्वेक्षणासाठी येणारा खर्च स्थानिक स्वराज्य संस्थांना केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व नागरी कार्य मंत्रालयाकडून उपलब्ध करुन देण्यात येणार आहे.

❖ **योजनेची जाहिरात व प्रसार :-**

स्थानिक सामाजिक व्यासपीठांवरून (Social Media) नाविन्यपूर्ण पद्धतीने विविध भागधारकांना सामील करून सदर योजनेचा प्रसार करण्यास प्रोत्साहन देण्यात येत आहे. तसेच आवश्यक जाहिरात व प्रचाराचे (IEC Material) साहित्य केंद्र शासनातर्फे पुरवण्यात येईल.

❖ **सनियंत्रण यंत्रणा :-**

उपरोक्त नमूद टप्पा १, २, ३, ४ व ५ यात समाविष्ट शहरांमधील अंमलबजावणीचे सनियंत्रण करण्याकरीता संबंधित विभागांनी परिशिष्ट-१ मध्ये नमूद विषयांसाठी राज्यस्तरीय व शहर स्तरावर नोडल अधिकारी नियुक्त करणे अपेक्षित आहे. सदर विभाग / शहरस्तरीय नोडल अधिकारी जिल्हा प्रशासनाशी/महापालिकेशी समन्वय साधून विविध योजनांमध्ये पात्र व्यक्तींचे समावेशन करण्याबाबत कार्यवाही करतील. तसेच, योजनेतंर्गत राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय सनियंत्रण समिती स्थापन करणेच्या सूचना केंद्र शासनाने दिल्या असून त्यानुसार सदर योजनेच्या संनियंत्रणासाठी खालील प्रमाणे समित्या राहतील.

**अ) राज्य स्तरीय सनियंत्रण समिती :-**

| | |
|---|---|
| प्रधान सचिव, नगर विकास विभाग | अध्यक्ष |
| प्रधान सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| प्रधान सचिव, कामगार विभाग | सदस्य |
| प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | सदस्य |
| प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| प्रधान सचिव, महिला व बाल कल्याण विभाग | सदस्य |
| प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग | सदस्य |

| | |
|---|---|
| प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग | सदस्य |
| प्रधान सचिव, अल्प संख्यांक विभाग | सदस्य |
| प्रधान सचिव, कौशल्य विकास रोजगार विभाग | सदस्य |
| आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई, | निमंत्रक सदस्य सचिव |

**ब) महानगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायतीसाठी सनियंत्रण समिती :-**

सदर समिती प्रथम टप्प्यात समाविष्ट असलेल्या ०४ महानगरपालिकांसाठी, व्दितीय टप्प्यात समाविष्ट असलेल्या १५ महानगरपालिकांसाठी, तृतीय टप्प्यात समाविष्ट असलेल्या १०२ महानगरपालिका/नगरपालिका/नगर परिषद/नगरपंचायतीं, चौथ्या टप्प्यात समाविष्ट असलेल्या ३१ नगरपरिषद/ नगरपंचायतीसाठी,पाचव्या टप्प्यात समाविष्ट असलेल्या १४९ नगरपरिषद/ नगरपंचायतीसाठी कार्यरत राहील, तसेच विस्तारीत पाचव्या टप्प्यात समाविष्ट असलेल्या १५ नगरपरिषद/नगरपंचायतीसाठी कार्यरत राहील, सहाव्या टप्प्यात समाविष्ट असलेल्या ०३ नगरपंचायतींसाठी कार्यरत राहील,

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी / आयुक्त, महानगरपालिका (मोठ्या शहरांसाठी) | अध्यक्ष |
| अतिरिक्त जिल्हाधिकारी / उप जिल्हाधिकारी | सदस्य |
| जिल्हा पुरवठा अधिकारी | सदस्य |
| जिल्हा शिक्षण अधिकारी / महानगरपालिका उपायुक्त (शिक्षण) | सदस्य |
| जिल्हा वैद्यकीय आरोग्य अधिकारी / महानगरपालिका मुख्य आरोग्य अधिकारी | सदस्य |
| जिल्हा सामाजिक कल्याण अधिकारी/महानगरपालिका समाज कल्याण अधिकारी | सदस्य |
| जिल्हा अग्रणी बँक व्यवस्थापक अधिकारी | सदस्य |
| जिल्हा कामगार उपायुक्त / जिल्हा कामगार अधिकारी | सदस्य |
| महिला व बाल विकास अधिकारी | सदस्य |
| उपायुक्त (संबंधित / जिल्हा प्रशासन अधिकारी) | सदस्य सचिव |

०२. योजनेच्या वैशिष्टामध्ये नमूद ८ योजनेसंबंधी विभागाचे जिल्ह्यातील इतर संबंधित अधिकारी यांना बैठकीत आवश्यकतेनुसार बोलाविण्याचे अधिकार अध्यक्षांना राहतील. तेव्हा उपरोक्त योजनेची नागरी क्षेत्रात प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी सनियंत्रण समिती अध्यक्ष यांनी वेळोवेळी आढावा घेऊन योजनेचे संनियंत्रण करण्याबाबत दक्षता घ्यावी.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२०१७२८४४१६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

ANILKUMAR
RAMDASPANT UGLE

Digitally signed by ANILKUMAR RAMDASPANT UGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=1d265dc74c98f72f41f5a1403db16525e09e7de2e336c366de3a32ea2a050a8a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8BBD8635D43D23F28021156F3805161925 8C51238668F40D15D3209EA39554AA, cn=ANILKUMAR RAMDASPANT UGLE
Date: 2025.03.20 17:29:20 +05'30'

**(अनिलकुमार उगले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.उप मुख्यमंत्री (वित्त) महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) प्रधान सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा, मंत्रालय, मुंबई-३२
१०) प्रधान सचिव, आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) प्रधान सचिव, महिला व बालकल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२) प्रधान सचिव, शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३) प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४) प्रधान सचिव, अल्पसंख्यांक विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५) प्रधान सचिव, कौशल्य विकास रोजगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई.
१७) आयुक्त, सर्व महानगरपालिका.
१८) जिल्हाधिकारी (सर्व).
१९) सर्व जिल्हा प्रशासन अधिकारी (नगर विकास).
२०) मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद / नगरपंचायत.
२१) निवडनस्ती (नवि-२०).